**मुल (जि.चंद्रपूर) नगरपरिषदेस विकास कामासाठी विशेष अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१४/१२/प्र.क्र.७७/नवि-१६,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० मार्च, २०१५

**प्रस्तावना** :-

राज्यातील काही नगरपालिकांना अत्यावश्यक कामांची निकड विचारात घेऊन वैशिष्टयपूर्ण योजनेअंतर्गत विशेष अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबतचे प्रस्ताव शासनाकडे प्राप्त झाले होते. त्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मूल (जि.चंद्रपूर) नगरपरिषदेस या शासन निर्णयान्वये "रस्ते विकास आणि ड्रेनेज व्यवस्थेसाठी" एकूण रु.१५.६१ कोटी इतके अनुदान सन २०१४-१५ मध्ये वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी संबंधीत कामांची सविस्तर अंदाजपत्रके, सक्षम प्राधिकरणाची /प्राधिका-याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेऊन त्यांना प्रशासकीय मान्यता द्यावी व प्रशासकीय मान्यता दिल्यानंतरच संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणेकडे निधी सुपूर्द करावा.

०२. सदर कामांना प्रशासकीय मान्यता खालील समिती देईल :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | -- | **अध्यक्ष** |
| २) | अधीक्षक अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग) | -- | **सदस्य** |
| ३) | मुख्याधिकारी (संबंधीत न.पा.) | -- | **सदस्य** |
| ४) | जिल्हा प्रकल्पअधिकारी (नगर प्रशासन) | -- | **सदस्य सचिव** |

०३. सदर कामांना जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता द्यावी.

(अ) प्रस्तुत कामांचे संबंधित कार्यान्वयीन/अंमलबजावणी करणा-या प्रशासकीय यंत्रणेकडून तपशीलवार अंदाजपत्रके प्राप्त करुन घ्यावीत. सदर अंदाजपत्रकातील कामांना, संबंधित सक्षम प्राधिकरण/ प्राधिकारी यांची तांत्रिक मान्यता घेतल्यानंतरच प्रशासकीय मान्यतेची कार्यवाही उपरोक्त नमूद जिल्हाधिकारी यांनी करावी.

(ब) सदर अंदाजपत्रकातील कामांना मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्चाच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिल्यास त्यासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

(क) प्रस्तुत कामांची अंमलबजावणी, कामे वेळेत व गुणवत्तेनुसार पूर्ण करण्यासाठी अंमलबजावणी यंत्रणा बदल करण्याचे अधिकार जिल्हाधिका-यांना राहतील.

(ड) संबंधित कामांना प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर उपलब्ध निधी आवश्यकतेनुसार संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेस संबंधित जिल्हाधिका-यांनी वितरीत करावा. कामासाठी उपलब्ध केलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेनुसार झाले किंवा कसे तसेच मंजूर कामांवरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील. तसेच सदर कामांच्या पूर्णत्वाचा अहवाल व त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे / महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील. तसेच यापूर्वी या लेखाशीर्षाखाली वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे खालील नमुन्यात प्राप्त करुन ही उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल कार्यालय व आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे पाठवावीत. तसेच या शासन निर्णयातील निधीच्या खर्चानंतर विनियोजन प्रमाणपत्रे व कामांच्या पूर्णत्वाचा अहवाल **(खालील नमुन्यात)** शासनाकडे/ महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

| शा.नि.क्र. व दिनांक | मंजुर तरतुदीचे वर्ष | लेखाशीर्ष | शासन निर्णयातील मंजूर रक्कम व प्राप्त झाल्याचा दिनांक | प्रस्तुत कामाच्या प्रशासकीय मान्यतेचा दिनांक | प्रस्तुत कामावर खर्च झालेली रक्कम व टक्केवारी | शिल्लक रक्कम व टक्केवारी | शिल्लक रक्कम अद्याप खर्च झालेली नसल्यास त्याबाबतची कारणे | खर्च झालेली असल्यास त्याचा देयक क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ४२१७०६०३ | | | | | | |
| | | | | | | | | |

(इ) प्रस्तुतची कामे ही सार्वजनिक मालकीच्या ठिकाणीच करावीत, कामाचे स्वरुप

सार्वजनिक असावे. तसेच त्यामुळे सर्वसमावेशक नागरिकांच्या प्राथमिक सोयीसुविधांमध्ये भर पडणार आहे याची खातरजमा केल्यानंतरच प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही करावी. कुठल्याही खाजगी स्वरुपाच्या कामांना मान्यता देण्यात येऊ नये. तसेच मंजूर केलेली कामे संबंधित शहराच्या विकास नियंत्रण नियमावली व विकास आराखड्याशी सुसंगत असावीत.

(ई) संबंधीत नगरपालिकेच्या ताब्यात असलेले रस्ते, नाले व इतर जागेवर कामे इतर यंत्रणेमार्फत करावयाचे असल्यास संबंधित नगरपालिकेच्या मुख्याधिका-याची ना-हरकत प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी घ्यावी.

(उ) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचे अवलंबन करुन/ वित्तीय अधिकारांच्या (Financial power) मर्यादेत व कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग/ अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी यांची राहील.

०४. सदर निधी वितरीत करण्यासाठी जिल्हाधिकारी चंद्रपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी **तसेच** नियंत्रक अधिकारी म्हणून या शासननिर्णयाद्वारे घोषीत करण्यात येत आहे. संबंधित कामांना प्रशासकीय व सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर व उपरोक्त अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून सदरचा निधी जिल्हाधिकारी यांनी संबंधीत नागरी स्वायत्त संस्थेला/ अंमलबजावणी यंत्रणा यांना वितरीत करावा.

०५. सदर प्रयोजनावरील खर्च “मागणी क्रमांक एफ-५, मुख्यलेखाशीर्ष ४२१७, नगरविकासावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे इत्यादिंना सहाय्य पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००) (०८) नगरपरिषदांना वैशीष्टयपूर्णकामासाठी विशेष अनुदान (४२१७०६०३) (दत्तमत) ३१, सहाय्यक अनुदाने” या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ करीता उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०६. स्थानिक स्वराज्य संस्थेच्या हद्दीमध्ये निवडणूक आचारसंहिता लागू आहे अथवा कसे याबाबत संबंधीत जिल्हाधिकारी यांनी आवश्यक ती खात्री करावी.

०७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१२१/व्यय-३ दिनांक ०३/०३/२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१०१७३५५७९९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashikant Narhari Yoge

Digitally signed by Shashikant Narhari Yoge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shashikant Narhari Yoge
Date: 2015.03.10 17:47:19 +05'30'

( शशिकांत योगे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रती**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,

२) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,

३) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२,

४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,

५) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,

६) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर

७) जिल्हाधिकारी चंद्रपूर, चंद्रपूर

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर

१०) मुख्याधिकारी, मुल नगरपालिका, जि.चंद्रपूर

११) अवर सचिव / कक्ष अधिकारी (नवि-४),नगरविकास विभाग,

१२) लेखा अधिकारी (नवि-३१), नगरविकास विभाग

१३) निवड नस्ती- नवि-१६.